**महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ (मर्यादित) पुणे या महामंडळाच्या संचालक मंडळावर सैन्यदलातील सेवानिवृत्त अधिका-यांची नेमणूक करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र.मासैमं -२०११/प्र.क्र.५४/का.२८,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ सप्टेंबर,२०११

**वाचा:**-(१)शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:मासैक-२००५/६२३/प्र.क्र.११८/२००५/२८,दिनांक २३ जून,२००८.

(२)शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक:मासैमं २००६/२०११/प्र.क्र.३१२/०६/२८, दिनांक ७/११/२००८.

(३))शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:मासैक-२००९/२०७/प्र.क्र.७५/का.२८,दिनांक १० मार्च,२०१०.

(४)व्यवस्थापकीय संचालक, , महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ, मर्या.,पुणे यांची पत्रे क्र.मासैम/शासन, दिनांक १७ जानेवारी, ५ मार्च,२०११ .

(५)संचालक, सैनिक कल्याणविभाग, पुणे यांचे पत्र क्र.११०१२/रासैमं/का.स./सैकवि-१/२४८,दिनांक ११ जुलै,२०११.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाची स्थापना दि.१८.१.२००२ च्या शासन निर्णयानुसार करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या मेमोरॅन्डम ऑफ असोसिएशन आणि आर्टिकल्स ऑफ असोसिएशन मधील कलम ७१ नुसार महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळावर किमान ३ व कमाल १२ संचालक नियुक्त करता येतात.तसेच आर्टिकल्स ऑफ असोसिएशन मधील कलम ७२ व ७३ नुसार हया महामंडळाच्या संचालक मंडळावर अध्यक्ष व संचालक नियुक्तीचे अधिकार मा.राज्यपाल यांना आहेत.

२. महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या संचालक मंडळाच्या रचनेनुसार संरक्षक दलातील कमिशण्ड ऑफिसर दर्जाच्या खाली नसलेले व निवृत्तीवेतनधारक असलेले तीन माजी सैनिक अधिकारी संदर्भाधीन अनुक्रमांक १ व ३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळाच्या संचालक मंडळावर नियुक्त केलेले आहेत. या अधिका-यांपैकी संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:मासैक-२००५/६२३/प्र.क्र.११८/२००५/२८,दिनांक २३ जून,२००८, दिनांक २३/६/२००८ अन्वये नियुक्त केलेले संचालक, लेप्टनंट जनरल (निवृत्त) डी.बी. शेकटकर, पुणे यांचा महामंडळाच्या संचालक पदावरील ३ वर्षाचा कार्यकाल संपुष्टात आल्याने

त्यांच्या जागी सैन्य दलातून निवृत झालेले "**मेजर जनरल (निवृत्त) सी. डी. सावंत,आशिष, ७-अ,कृषि हौसिंग सोसायटी,गोखले नगर जवळ, पुणे ४११००१६**" यांची, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ मर्या.पुणे या महामंडळाच्या संचालक मंडळावर संचालक म्हणून शासन नियुक्ती करीत आहे:

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९१६१५२८१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( सि. मं. ईनामदार )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. राज्यमंत्री (माजी सैनिक कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग (माजी सैनिक कल्याण ) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
महालेखापाल,(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र , मुंबई,
महालेखापाल,(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ, रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रस्ता, घोरपडी, पुणे - ४११ ००१.
संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय,रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर ,सोलापूर रस्ता,घोरपडी,पुणे - ४११ ००१.
* मेजर जनरल (निवृत्त) सी. डी. सावंत,आशिष, ७-अ,कृषि हौसिंग सोसायटी,गोखले नगर जवळ, पुणे ४११००१६ (व्यवस्थापकीय संचालक, महा. माजी सैनिक महामंडळ,पुणे यांच्यामार्फत.)
* लेफ्टनंट जनरल श्री.डी.बी.शेकटकर, ११२/१, कोरेगांव पार्क, पुणे-४११ ००१.
* कर्नल (निवृत)भगतसिंह देशमुख, बि.१६/२,साळुंखे विहार,पुणे-४११०२२.
* ब्रिगेडीयर (निवृत) ए.एन. शिरपूरकर, व्ही.एस एम., बि.७/२,साळुखे विहार,पुणे-४११०२२.
निवड नस्ती (२ प्रती),

* पत्राने